**महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास सवलतींच्या मूल्यांच्या प्रतिपूर्तीपोटी रु.२८३.८७ कोटी रोखीने प्रदान करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्र.एसटीसी१०१४/प्र.क्र.५३१ /परि १

मंत्रालय, मुंबई ४०० ०३१.
दिनांक : २७ मार्च, २०१५

<u>वाचा</u>

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसटीसी ३४००/६३१/सीआर ३१/परि १, दिनांक २० जून, २०००.
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसटीसी ०११३/प्र.क्र.१०३/परि १, दिनांक १०/२/ २०१४.
३) शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसटीसी ०४१४/प्र.क्र. १९१/परि १, दिनांक ३१ मे, २०१४.
४) शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसटीसी ०७१४/प्र.क्र. ४३२ /परि १, दिनांक ३० जुलै, २०१४.
५) शासन निर्णय, गृह विभाग क्र.एसटीसी ०११५/प्र.क्र.२४/परि १, **दि**.२०/३/२०१५.
६) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.मा.प.म. यांचे पत्र क्र.राप/लेखा/नोंदणी/सवलत/७६१, दिनांक २३ मार्च, २०१५.

<u>प्रस्तावना</u>

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाला प्रवासी कराची रक्कम १७.५ टक्के या दराने शासनास अदा करावी लागते. महामंडळाने प्रवासी कराच्या १२ टक्के प्रमाणे येणारी प्रवासी कराची रक्कम शासनास अदा करावी व उर्वरित ५.५ टक्के दराने येणारी रक्कम भांडवली अंशदानाच्या स्वरुपात महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास देण्यात यावी, असे आदेश संदर्भाधिन दि.२०.०६.२००० च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. शासनास प्राप्त होणारा १२% प्रवासी कर व महामंडळास विविध सवलत मूल्याची प्रतिपूर्तीपोटी दयावयाची रक्कम यांचे पुस्तकी समायोजन करण्यात येते. तथापि, सवलतीचे मूल्याची रक्कम उपलब्ध प्रवासी करापेक्षा जास्त असल्यामुळे प्रतिवर्षी सवलतीच्या मुल्यांची संपूर्ण रक्कम प्रवासी करातून समायोजित होत नाही. त्यामुळे काही रक्कम असमायोजित राहिल्याने त्यामध्ये प्रतिवर्षी वाढ होत असते. त्यानुसार दि.३१.०३.२०१४ अखेर एकूण रु.१३८६.०० कोटी इतके प्रवासी मूल्य असमायोजित होते. त्यामुळे सन २०१४-१५ मध्ये संदर्भाधिन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये रु.५०० कोटी, संदर्भाधिन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये रु.४०५ कोटी व संदर्भाधिन क्र.५ च्या शासन निर्णयान्वये रु.३१९.४५ कोटी रक्कम महामंडळास रोखीने प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार महामंडळास विविध सवलत मुल्याची दिनांक ३१.०३.२०१४ अखेर उर्वरित रक्कम तसेच सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी संदर्भाधिन दिनांक १०/२/२०१४ च्या शासन निर्णयानुसार संबधित प्रशासकीय विभागांनी प्रवास सवलत मुल्याची प्रतिपूर्ती राज्य परिवहन महामंडळास न केल्याने सन २०१४-१५ मधील प्रवास सवलत मुल्याची काही रक्कम अशी एकूण रु.२८३.८७ कोटी रक्कम रोखीने अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास विविध प्रवास सवलत मूल्याच्या प्रतिपूर्तीपोटी द्यावयाच्या शिल्लक रक्कमेपैकी रु.२८३.८७ कोटी (अक्षरी रुपये दोनशे त्र्याअंशी कोटी सत्त्याऐंशी लक्ष फक्त) रक्कम सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतूदीमधून रोखीने प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०१४-१५ च्या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा आणि खालील लेखाशीर्षामध्ये खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र. बी-३,
२०४१, वाहनांवरील कर
(००) ००१, संचालन व प्रशासन, (०१) परिवहन आयुक्त
(०१)(०१) परिवहन आयुक्त आस्थापना-योजनेतर (द.२०४१ ००१८),
३३ - अर्थसहाय्य

३. यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आंहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावी.

४. हा निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९४/१५/व्यय-८, दिनांक २७/०३/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५०३३११५४६१९२४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash K Sabale

Digitally signed by Prakash K Sabale
DN: CN = Prakash K Sabale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.03.31 15:56:16 +05'30'

**(प्रकाश साबळे)**
उपसचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
२.महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई,
३.उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
४.परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
७.वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
८.वित्त विभाग (व्यय -८/साऊ/ अर्थसंकल्प-१०/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९.गृह विभाग (बीयुडी-१/बीयुडी-२/परिवहन-३/परिवहन-४) मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती/परि १.